जोषयेत्सर्वकर्माणिविद्वान्युक्तःसमाचरन्॥ २६॥

विद्वान् ज्ञानीजोतो, कर्मसंगिनां कर्मीआदरज्यांसऐसे, अज्ञानां अज्ञानीजेत्यांचा, बुद्धिभेदं बुद्धीचेंचळणजेंत्यातें, नजनयेत् उत्पादननकरो, युक्तः युक्तहोत्साता, समाचरन् बरवेंआचरणकरितहोत्साता, सर्वकर्माणि सर्वकर्मेंजींत्यांतें, जोषयेत् सेवनकरो, ॥ २६ ॥ ॥

प्रकृतेःक्रियमाणानिगुणैःकर्माणिसर्वशः॥
अहंकारविमूढात्माकर्त्ताऽहमितिमन्यते॥ २७॥

सर्वशः सर्वप्रकारें, प्रकृतेः प्रकृतीचे, गुणैः गुणजेतीहींकरून, क्रियमाणानि संपादिजेताहेतऐशीं, कर्माणि कर्मेंजींत्यांतें, अहंकारविमूढात्मा अहंकारेंकरूनभ्रांतझालेंअंतःकरणज्याचेंतो, अहंकर्ता मीकर्ता, इतिमन्यते ऐसेंमानितो, ॥ २७ ॥ ॥ ॥ ॥

तत्त्ववित्तुमहाबाहोगुणकर्मविभागयोः॥
गुणागुणेषुवर्त्तंतइतिमत्वानसज्जते॥ २८॥

हेमहाबाहो अगाअर्जुना, गुणकर्मविभागयोः सत्वादिगुणकर्मांचाविभागाचा, तत्त्ववित्तु यथार्थजाणणारतोतर, गुणाः इंद्रियेंजींतीं, गुणेषु विषयांचाठायीं, वर्तंते वर्तताहेत, इतिमत्वा ऐसेंमानून, नसज्जते आसक्तहोतनाहीं ॥ २८ ॥ ॥ ॥ ॥ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाःसज्जंतेगुणकर्मसु॥
तानकृत्स्नविदोमंदान्कृत्स्नविन्नविचालयेत्॥ २९॥

प्रकृतेः प्रकृतिजीतीचे, गुणसंमूढाः गुणेंकरूनअत्यंतमूढजेते, गुणकर्मसु इंद्रियगुणसम्बद्धिकर्मेंजींत्यांचाठायीं, सज्जंते आसक्तहोताहेत, कृत्स्नवित् ज्ञानीजोतो, तानकृत्स्नविदोमंदान् तेअज्ञानमतिमंदजेत्यांतें, नविचालयेत् कर्मापासूननचाळवो, ॥ २९ ॥ ॥ ॥

मयिसर्वाणिकर्माणिसंन्यस्याध्यात्मचेतसा॥
निराशीर्निर्ममोभूत्वायुद्ध्यस्वविगतज्वरः॥ ३० ॥

अध्यात्मचेतसा निर्मळएकाग्रअंतःकरणेंकरून, सर्वाणिकर्माणि सर्वकर्मेंजींत्यांतें, मयिसंन्यस्य माझाठायींसमर्पून, निराशीर्निर्ममः निष्काममममतारहितऐसा, भूत्वाहोऊन, विगतज्वरः शोकरूपज्वररहितहोत्साता, युद्ध्यस्व युद्धकर, ॥ ३० ॥ ॥ ॥

येमेमतमिदंनित्यमनुतिष्ठंतिमानवाः॥
श्रद्धावंतोनसूयंतोमुच्यंतेतेऽपिकर्मभिः॥ ३१ ॥

श्रद्धावंतः विश्वासीऐसे, अनसूयंतः किमपिदोषारोपनकरणारऐसे, येमानवाः जेमनुष्यजेते, मे माझें, इदंमतं हेंमतजेंत्यातें, नित्यं सर्वदा, अनुतिष्ठंति करिताहेत, तेपि तेही, कर्मभिः कर्मेंजींतींहीं, मुच्यंते मुक्तकरिजेताहेत, ॥ ३१ ॥ ॥ ॥ ॥ ॥

येत्वेतदभ्यसूयंतोनानुतिष्ठंतिमेमतं॥
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धिनष्टानचेतसः॥ ३२ ॥

येतु जेतरी, एतत् हें, मेमतं माझेंमतजेंयातें, अभ्यसूयंतः द्वेषीतहोत्साते, नानुतिष्ठंति करितनाहींत, अचेतसः अविवेकीऐसे, सर्वज्ञानविमूढान् कर्मब्रह्मज्ञानाविषयींअत्यंतमूढऐसे, नष्टान् नाशातेंपावलेऐसे, तान् त्यांतें, विद्धि जाण, ॥ ३२ ॥ ॥ ॥ ॥

सदृशंचेष्टतेस्वस्याःप्रकृतेर्ज्ञानवानपि॥
प्रकृतिंयांतिभूतानिनिग्रहःकिंकरिष्यति॥ ३३ ॥

ज्ञानवानपि ज्ञानवंतजोतोही, स्वस्याः आपुलीऐशी, प्रकृतेः पूर्वसंस्काराधीनस्वभावजोत्याचा, सदृशं सारिखें, चेष्टते वर्ततो, भूतानि भूतेंजींतीं, प्रकृतिं पूर्वोक्तस्वभावाप्रति, यांति अनुवर्तताहेत, निग्रहः

निग्रहजोतो, किंकरिष्यति कायकरील, ॥ ३३ ॥ ॥ ॥

इंद्रियस्येंद्रियस्यार्थेरागद्वेषौव्यवस्थितौ ॥
तयोर्नवशमागच्छेत्तौह्यस्यपरिपंथिनौ ॥ ३४ ॥

इंद्रियस्येंद्रियस्य प्रतिइंद्रियांचा, अर्थे स्वस्वविषयीं, रागद्वेषौ अनुकूलींआणिप्रतिकूलींरागद्वेषजेते, व्यवस्थितौ अवश्यंभाविआहेत, तयोः त्यांचा, वशं स्वाधीनऐसा, नआगच्छेत् नाहींहोत, हि ज्याकारणास्तव, तौरागद्वेषौ तेरागद्वेषजेते, अस्य यामुमुक्षूतें, परिपंथिनौ घातकप्रतिपक्षि, ॥ ३४ ॥ ॥ ५ ॥

श्रेयान्स्वधर्मोविगुणःपरधर्मात्स्वनुष्ठितात् ॥
स्वधर्मेनिधनंश्रेयःपरधर्मोभयावहः ॥ ३५ ॥

स्वनुष्ठितात् बरवाअनुष्ठिलाऐसा, परधर्मात् परधर्माहून, विगुणः गुणरहितऐसा, स्वधर्मः स्वकीयधर्मजोतो, श्रेयान् प्रशस्त, स्वधर्मे आपल्याधर्माचाठायीं, निधनं मरणजेंतेंही, श्रेयः स्वर्गादिप्राप्तिकरहोय, परधर्मः परधर्मजोतो, भयावहः भयदेणारऐसा, ॥ ३५ ॥

अर्जुनउवाच अथकेनप्रयुक्तोऽयंपापंचरतिपूरुषः ॥
अनिच्छन्नपिवार्ष्णेयबलादिवनियोजितः ॥ ३६ ॥

हेवार्ष्णेय हेवृष्णिकुलोत्पन्ना, अनिच्छन्नपि इच्छानसतांही, बलात् बलास्तव, नियोजितइव अत्यंतनियोजिल्याचेंपरी, अयं हा, अथ यानंतर, केनप्रयुक्तः कोणेंप्रेरिलाऐसा, पूरुषः पुरुषजोतो, पापं पापातें, चरति आचरतो, ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच काममएषक्रोधएषरजोगुणसमुद्भवः ॥ महाशनोमहापाप्माविद्ध्येनमिहवैरिणं ॥ ३७ ॥

रजोगुणसमुद्भवः रजोगुणापासूनउद्भवलाऐसा, एषःकामः हाकाम

जोतो, एषःक्रोधः हाचउपहतअसतांक्रोधहोय, महाशनः विषयीं-अतृप्तऐसा, महापाप्मा महापापरूपऐसा, इह यामोक्षमार्गीविषयीं, एनंवैरिणं यावैरियातें, विद्धि जाण, ॥ ३७ ॥

धूमेनाव्रियतेवन्हिर्यथादर्शोमलेनच ॥
यथोल्बेनावृतोगर्भस्तथातेनेदमावृतं ॥ ३८ ॥

यथा जैसें, धूमेन धूमजोतेणेंकरून, वन्हिः वन्हिजोतो, आव्रियते आच्छादिजेतो, मलेन मलेंकरून, आदर्शश्च आरसाजोतोही, यथा जैसा, उल्बेन खोळेंकरून, गर्भःगर्भगतपिंडजोतो, आवृतः संपूर्ण-आच्छादिला, तथा तैसें, तेन तोजोकामतेणें, इदं हेंज्ञानजेतें, आवृ-तं आच्छादिजेलें, ॥ ३८ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

आवृतंज्ञानमेतेनज्ञानिनोनित्यवैरिणा ॥
कामरूपेणकौंतेयदुष्पूरेणानलेनच ॥ ३९ ॥

हेकौंतेय अगाअर्जुना, कामरूपेण इच्छाआहेस्वरूपज्याचेंऐसा, ए-तेननित्यवैरिणा हाजोनिरंतरवैरीयेणें, ज्ञानिनः ज्ञानिजोत्याचें, ज्ञा-नं ज्ञानजेतें, आवृतं आच्छादिलेंआहे, दुष्पूरेण बहुतांविषयेंकरूनही पूर्णनव्हेऐसा, अनलेन अग्निरूपचकिंवाकाय, ॥ ३९ ॥

इंद्रियाणिमनोबुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ॥
एतैर्विमोहयत्येषज्ञानमावृत्यदेहिनम् ॥ ४० ॥

अस्य याकामास, इंद्रियाणि इंद्रियेंजींतीं, मनः मनजेतें, बुद्धिः बुद्धिजीती, अधिष्ठानं आश्रयस्थान, उच्यते बोलिजेतें, एषः हाका-मजोतो, एतैः इंद्रियादिकजींतींहिंकरून, ज्ञानं ज्ञानजेंत्यातें, आवृत्य आच्छादून, देहिनं देहीजोत्यातें, विमोहयति मोहातेंपाववितो, ४०

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौनियम्यभरतर्षभ ॥

पाप्मानंप्रजहिह्येनंज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

हेभरतर्षभ अगाभरतवंशश्रेष्ठा, तस्मात् त्याकारणास्तव, त्वं तूं, आदौ प्रथम, हि निश्चयेंकरून, इंद्रियाणि इंद्रियेंजीत्यांतें, नियम्य नियमून, ज्ञानविज्ञाननाशनं अपरोक्षापरोक्षज्ञानातेंनासणारऐसा, एनंपाप्मानं हापापीजोयातें, प्रजहि टाकीं, ॥ ४१ ॥

इंद्रियाणिपराण्याहुरिंद्रियेभ्यःपरंमनः ॥
मनसस्तुपराबुद्धिर्योबुद्धेःपरतस्तुसः ॥ ४२ ॥

इंद्रियाणि ज्ञानेंद्रियेंजीत्यांतें, पराणि देहादिकाहूनश्रेष्ठऐशांतें, आहुः बोलताहेत, इंद्रियेभ्यः इंद्रियेंजीत्याहून, मनः संकल्पविकल्पजेते, परं श्रेष्ठहोय, मनसस्तु मनाहूनपरबुद्धीतेंबोलताहेत, यः जो, बुद्धेःपरतः बुद्धिहूनपर, सः तोतरीआत्माचहोय, ॥ ४२ ॥

एवंबुद्धेःपरंबुध्वासंस्तभ्यात्मानमात्मना ॥
जहिशत्रुंमहाबाहोकामरूपंदुरासदं ॥ ४३ ॥

हेमहाबाहो अगाअर्जुना, एवं पूर्वोक्तप्रकारेंकरून, बुद्धेः बुद्धीहून, परं उत्कृष्टजोआत्मात्यातें, बुध्वा जाणोन, आत्मना शुद्धबुद्धिकरून, आत्मानं मनातें, संस्तभ्य निश्चयकरून, कामरूपं कामंचआहेरूपज्याचेंऐसा, दुरासदं दुःखेंकरूनसाधावयाअशक्यऐसा, शत्रुं शत्रूतें, जहि मारीं, ॥ ४३ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

हरिःॐतत्सदितिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सुब्रह्मविद्यायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादेकर्मयोगोनाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

---

# चतुर्थाध्यायप्रारंभः



श्रीगणेशायनमः ॥ पूर्वीउपेयोपायरूपज्ञानकर्मयोगदोनीसांगीत-
ले, फळऐक्यकरूनत्यांतेंस्तवितो, ॥

श्रीभगवानुवाच इमंविवस्वतेयोगंप्रोक्तवानह
मव्ययं ॥ विवस्वान्मनवेप्राहमनुरिक्ष्वाकवेऽब्र
वीत् ॥ १ ॥

अहं मी, इमं हा, अव्ययं नाशरहितऐसा, योगं योगातें, विवस्वते सूर्याकारणें, प्रोक्तवान् बोलताझालों, विवस्वान् सूर्यजोतो, मनवे मनूकारणें, प्राह बोलताझाला, मनुः मनुजोतो, इक्ष्वाकवे स्वपुत्र-इक्ष्वाकुजोत्याकारणें, अब्रवीत् बोलताझाला, ॥ १ ॥ ॥ ७ ॥

एवंपरंपराप्राप्तमिमंराजर्षयोविदुः ॥
सकालेनेहमहतायोगोनष्टःपरंतप ॥ २ ॥

राजर्षयः राजर्षीजेते, एवं पूर्वोक्तप्रकारें, परंपराप्राप्तं पुत्रपौत्रादि-परंपरेंकरूनप्राप्तऐसा, इमं हायोगजोत्यातें, विदुः जाणतेजाहले, हे-परंतप अगाअर्जुना, इह यालोकीं, सः तो, योगः योगजोतो, महताकालेन मोठाकाळजोतेणेंकरून, नष्टः नाशातेंपावला, ॥ २ ॥

सएवायंमयातेऽद्ययोगःप्रोक्तःपुरातनः ॥
भक्तोसिमेसखाचेतिरहस्यंह्येतदुत्तमं ॥ ३ ॥

सएवायं तोचहा, पुरातनः बहुजुनाऐसा, योगः योगजोतो, अद्य आज, मया म्यां, ते तुजकारणें, प्रोक्तः सांगिजेला, यतः जाकारणास्तव, भक्तोसि भक्तआहेसह्मणून, मे माझा, सखाचेति मित्रआहेस, इति याकारणास्तव, एतत् हें, उत्तमं उत्तमऐसें, रहस्यं गोप्यआहे ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**अर्जुनउवाच अपरंभवतोजन्मपरंजन्मविवस्व
तः॥ कथमेतद्विजानीयांत्वमादौप्रोक्तवानिति॥४॥**

भवतः तुझें, जन्म उपजणेंजेतें, अपरं आलीकडील, विवस्वतः सूर्याचें, जन्म जननजेतें, परं पूर्वकाळीचेंऐसेंअसतां, त्वं तूं, आदौ पहिलें, प्रोक्तवान् बोललास, इति हें, अहं मी, एतत् विरुद्धार्थजेंत्यातें, कथं कैसें, विजानीयां जाणोंशकेन, ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥

**श्रीभगवानुवाच बहूनिमेव्यतीतानिजन्मानितव
चार्जुन॥ तान्यहंवेदसर्वाणिनत्वंवेत्थपरंतप॥५॥**

हेअर्जुन अगाअर्जुना, मे माझीं, तवच तुझींही, बहूनि बहुतऐशीं, जन्मानि जन्मेंजींतीं, व्यतीतानि अतिक्रमिलीं, हेपरंतप अगाअर्जुना, अहं मी, तानिसर्वाणि तींसर्वजन्मेंजींत्यांतें, वेद जाणतों, त्वं तूं, नवेत्थ नाहींजाणत, ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**अजोऽपिसन्नव्ययात्माभूतानामीश्वरोपिसन्॥
प्रकृतिंस्वामधिष्ठायसंभवाम्यात्ममायया॥ ६॥**

अहं मी, अव्ययात्मा नाशरहितऐसा, अजोपिसन् जन्मनाहींऐसाहोत्साताही, भूतानामीश्वरोपिसन् भूतेंजींत्यांचानियंताऐसाहोत्साताही, स्वांप्रकृतिं आपलीप्रकृतीजेशुद्धसत्वात्मिकामूर्तितीतें, अधिष्ठाय अंगीकारकरून, आत्ममायया आत्ममायाजेतीणेंकरून, संभवामि होतों, ॥ ६ ॥ ॥ ७ ॥

**यदायदाहिधर्मस्यग्लानिर्भवतिभारत॥
अभ्युत्थानमधर्मस्यतदात्मानंसृजाम्यहं॥ ७॥**

हेपरंतप अगाअर्जुना, हि निश्चयेंकरून, धर्मस्य धर्मजोत्याची, यदायदा जाजासमयीं, ग्लानिः हानिजते, भवति होते, अधर्मस्य अ-

धर्मजोत्याचें, अभ्युत्थानं आधिक्यजेतें, भवति होतें, तदा तेव्हां, अहं मीजोतो, आत्मानं आपणातें, सृजामि सृजितों, ॥ ७ ॥

परित्राणायसाधूनांविनाशायचदुष्कृतां ॥
धर्मसंस्थापनार्थायसंभवामियुगेयुगे ॥ ८ ॥

अहं मीजोतो, साधूनां साधूजेत्यांच्या, परित्राणाय चहूंकडूनरक्षणाकारणें, दुष्कृतां दुरितकर्मेंकरणारजेत्यांच्या, विनाशायच शिक्षाकरावयाकारणें, धर्मसंस्थापनार्थाय धर्माच्यास्थापनप्रयोजनाकारणें, युगेयुगे युगायुगाचाठायीं, संभवामि अवतारधरितों, ॥ ८ ॥

जन्मकर्मचमेदिव्यमेवंयोवेत्तितत्त्वतः ॥
त्यक्त्वादेहंपुनर्जन्मनैतिमामेतिसोऽर्जुन ॥ ९ ॥

हेअर्जुन अगाअर्जुना, यः जो, मे माझें, दिव्यं प्रकाशात्मकऐसें, जन्म जन्मजेंत्यातें, कर्मच कर्मजेंत्यातेंही, एवं पूर्वोक्तप्रकारें, तत्त्वतः याथार्थ्यैंकरून, वेत्ति जाणतो, सः तो, देहंत्यक्त्वा देहातेंटाकून, पुनः मागुतेन, जन्म जन्मजेंत्याप्रति, नएति नाहींयेत, किंतु तरकाय, मामेति मातेंपावतो, ॥ ९ ॥ ॥ ७ ॥

वीतरागभयक्रोधामन्मयामामुपाश्रिताः ॥
बहवोज्ञानतपसापूतामद्भावमागताः ॥ १० ॥

वीतरागभयक्रोधाः गेलेआहेतभयक्रोधज्यांपासून, मन्मयाः माझाठायींएकनिष्ठऐसे, मामुपाश्रिताः मातेंचआश्रयकेलेऐसे, ज्ञानतपसापूताः ज्ञानरूपतपेंकरूनपवित्रऐसे, बहवः बहुत, मद्भावं माझ्यासायुज्यभावातें, आगताः येतेझाले, ॥ १० ॥

येयथामांप्रपद्यंतेतांस्तथैवभजाम्यहं ॥

ममवर्त्मानुवर्ततेमनुष्याःपार्थसर्वशः॥ ११ ॥

ये जे, मां मातें, यथा जैसे, प्रपद्यंते सकामअथवानिष्कामभजताहेत, अहं मी, तान् त्यांतें, तथैव तदपेक्षितफलदेऊन, भजामि प्रतिपाळितों, हेपार्थ अगाअर्जुना, यतः ज्याकारणास्तव, मनुष्याः मनुष्यजेते, सर्वशः सर्वप्रकारेंकरून, ममवर्त्म माझ्याभजनमार्गातें, अनुवर्तंते अनुसरताहेत, ॥ ११ ॥

कांक्षंतःकर्मणांसिद्धिंयजंतइहदेवताः॥
क्षिप्रंहिमानुषेलोकेसिद्धिर्भवतिकर्मजा॥ १२ ॥

इह यामनुष्यलोकाचाठायीं, कर्मणांसिद्धिं कर्मेंजींत्यांचीसिद्धिजेतीतें, कांक्षंतः फलापेक्षीतहोत्साते, देवताः इंद्रादिदेवजेत्यांतें यजंते यजिताहेत, हि ज्याकारणास्तव, मनुष्यलोके मनुष्यलोकाचाठायीं, कर्मजा कर्मजन्यऐशी, सिद्धिः सिद्धिजेते, क्षिप्रंभवति शीघ्रहोते, १२

चातुर्वर्ण्यंमयासृष्टंगुणकर्मविभागशः॥
तस्यकर्तारमपिमांविद्ध्यकर्तारमव्ययं॥ १३ ॥

मया म्यां, गुणकर्मविभागशः सत्वादिगुणकर्मेंजींत्यांच्याविभागास्तव, चातुर्वर्ण्यं ब्राह्मणादिचाऱ्हीवर्णजेते, सृष्टं सृजिलें, तस्य त्याचा, कर्तारमपि कर्ताऐसाही, मां मातें, अकर्तारं कर्तानव्हेऐशातें, अव्ययं नाशरहितऐशातें, विद्धि जाण, ॥ १३ ॥

नमांकर्माणिलिंपंतिनमेकर्मफलेस्पृहा॥
इतिमांयोभिजानातिकर्मभिर्नसबद्ध्यते॥ १४ ॥

कर्माणि विश्वसृष्ट्यादिकर्मेंजींतीं, मां मातें, नलिपंति लेपातेंपाववितनाहींत, मे मज, कर्मफले कर्मफलाचाठायीं, स्पृहा आसक्तिजेते, न नाहीं, इति याप्रकारें, यः जो, मां मातें, अभिजानाति जाणतो, क-

र्मभिः कर्मेंजीतीहींकरून, सः तो, नबध्यते नाहींबंधातेंपावत ॥ १४॥

एवंज्ञात्वाकृतंकर्मपूर्वैरपिमुमुक्षुभिः॥
कुरुकर्मैवतस्मात्त्वंपूर्वैःपूर्वतरंकृतं॥ १५॥

पूर्वैः पहिलेऐसे, मुमुक्षुभिरपि मोक्षेच्छावंतजेतीहीं, एवंज्ञात्वा याप्रकारेंजाणोन, कर्म कर्मजेतें, कृतं केलें, तस्मात् त्याकारणास्तव, त्वं तूं, पूर्वैः पूर्वीलजेतीहीं, कृतं केलेंऐसें, पूर्वतरं अत्यंतपूर्वऐसें, कर्मैव कर्मजेंत्यातेंच, कुरु कर, ॥ १५ ॥

किंकर्मकिमकर्मेतिकवयोऽप्यत्रमोहिताः॥
तत्तेकर्मप्रवक्ष्यामियज्ज्ञात्वामोक्ष्यसेऽशुभात्॥ १६

कवयोपि पंडितजेतेही, किंकर्म कैसेंतेंकर्म, किमकर्म कैसेंतेंअकर्मकरणें, इति ऐसें, अत्र येविषयीं, मोहिताः मोहातेंपावलेआहेत, अहं मी, तत्कर्म त्याकर्मातें, ते तुजकारणें, प्रवक्ष्यामि सांगेन, यत् जें, ज्ञात्वा जाणोन, अशुभात् अशुभसंसारजोत्यापासून, मोक्ष्यसे मुक्तहोशील, ॥ १६ ॥ ॥ ७ ॥

कर्मणोह्यपिबोद्धव्यंबोद्धव्यंचविकर्मणः॥
अकर्मणश्चबोद्धव्यंगहनाकर्मणोगतिः॥ १७॥

हि निश्चयेंसी, कर्मणः विहितकर्मजेंत्याचें, तत्त्वं तत्त्वजेतें, बोद्धव्यं जाणावयासयोग्यऐसें, अस्ति आहे, च ह्मणजे आणखी, विकर्मणः निषिद्धकर्मजेंत्याचें, तत्त्वं तत्त्वजेतें, बोद्धव्यं जाणावयासयोग्यआहे, अकर्मणः तूष्णींभावजोत्याचें, तत्त्वं तत्त्वजेतें, बोद्धव्यं जाणावयासयोग्यऐसेंआहे, अतः याकारणास्तव, कर्मणः कर्मसामान्याची, गतिः तत्त्वजेंतें, गहना दुर्बोधऐशी, भवति होते, ॥ १७ ॥

कर्मण्यकर्मयःपश्येदकर्मणिचकर्मयः॥

सबुद्धिमान्मनुष्येषुसयुक्तःकृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

कर्मणि आरोपितदेहेंद्रियादिव्यापारीं, अकर्म अकर्मात्मस्वरूपालोचनेंकरूनकर्माभावातें, यःपश्येत् जोपाहतो, अकर्मणिउगेंचअशक्याचेठायीं, कर्म निवृत्त्याख्यप्रयत्नरूपव्यापारजोत्यातें, यःपश्येत् जोपाहतो, सः तो, मनुष्येषु मनुष्यजेत्यांमध्यें, बुद्धिमान् बुद्धिमंत, सः तो, युक्तः युक्तहोत्साता, कृत्स्नकर्मकृत् सर्वकर्मकर्ता, ॥ १८ ॥

यस्यसर्वेसमारंभाःकामसंकल्पवर्जिताः ॥
ज्ञानाग्निदग्धकर्माणंतमाहुःपंडितंबुधाः ॥ १९ ॥

बुधाः पंडितजेते, यस्य ज्याचे, कामसंकल्पवर्जिताः कामनासंकल्पेंकरूनवर्जऐसे, सर्वेसमारंभाः सर्वहीकर्मेंजींतीं, ज्ञानाग्निदग्धकर्माणं ज्ञानरूपअग्नीकरूनजाळिलींकर्मेंजेणें, तं त्यातें, पंडितं ज्ञानिऐशातें, आहुः बोलताहेत, ॥ १९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५ ॥

त्यक्त्वाकर्मफलासंगंनित्यतृप्तोनिराश्रयः ॥
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपिनैवकिंचित्करोतिसः ॥ २० ॥

कर्मफलासंगं कर्तृत्वाभिमानभोगेच्छेतें, त्यक्त्वा टाकून, नित्यतृप्तः निरंतरतृप्तऐसा, निराश्रयः देहादिअभिमानशून्यऐसा, कर्मणि कर्माचाठायीं, अभिप्रवृत्तोपि बरव्याप्रकारेंप्रवर्तलाजरी, सः तो, किंचित् काहीं, नैवकरोति नाहींचकरीत, ॥ २० ॥ ॥ ५ ॥

निराशीर्यतचित्तात्मात्यक्तसर्वपरिग्रहः ॥
शारीरंकेवलंकर्मकुर्वन्नाप्नोतिकिल्बिषं ॥ २१ ॥

निराशीः निष्कामऐसा, यतचित्तात्मा निर्मलआहेचित्तआणिआत्माह्मणजेदेहज्याचाऐसा, त्यक्तसर्वपरिग्रहः टाकिलेआहेतभोगउपकरणेंऐसाजोतो, केवलं कर्तृत्वाभिमानशून्यऐसें, शारीरं शरीरस्थि-

तिमात्रप्रयोजनऐसें, कर्म कर्मातें, कुर्वन् लोकदृष्ट्याकरितहोत्साता, किल्बिषं संसारातें, नाप्नोति नाहींपावत, ॥ २१ ॥ ॥ ॥

**यदृच्छालाभसंतुष्टोद्वंद्वातीतोविमत्सरः॥**
**समःसिद्धावसिद्धौचकृत्वाऽपिननिबध्यते॥२२॥**

यदृच्छालाभसंतुष्टः अप्रार्थितलाभेंकरूनसंतुष्ट, द्वंद्वातीतः शीतोष्णादिकातेंअतिक्रमूनवर्तलाऐसा, विमत्सरः मत्सररहितऐसा, सिद्धावसिद्धौच सिद्धिअसिद्धिविषयीं, समः हर्षविषादरहितऐसा, कृत्वापि कर्मातेंकरूनही, ननिबध्यते नाहींबंधातेंपावत, ॥ २२ ॥ ॥ ७ ॥

**गतसंगस्यमुक्तस्यज्ञानावस्थितचेतसः॥**
**यज्ञायाचरतःकर्मसमग्रंप्रविलीयते॥ २३॥**

गतसंगस्य विषयाभिलाषरहितऐसा, ज्ञानावस्थितचेतसः अद्वैतज्ञानाचाठायींस्थिरचित्तऐसा, यज्ञाय परमेश्वराकारणें, कर्म कर्मजेंत्यातें, आचरतः आचरणारजोत्याचें, समग्रं वासनारहितकर्मजेतें, प्रविलीयते अकर्मत्वातेंपावतें, ॥ २३ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

**ब्रह्मार्पणंब्रह्महविर्ब्रह्माग्नौब्रह्मणाहुतं॥**
**ब्रह्मैवतेनगंतव्यंब्रह्मकर्मसमाधिना॥ २४॥**

अर्पणं स्रुक्स्रुवादिजेतें, ब्रह्म ब्रह्महोय, ब्रह्महविः घृतादिहोमद्रव्यजेतेंब्रह्महोय, ब्रह्माग्नौ ब्रह्मचअग्निजोत्याचाठायीं, ब्रह्मणा ब्रह्मरूपजोकर्तातेणें, हुतं होमिलें, तेनब्रह्मकर्मसमाधिना ब्रह्मरूपकर्माचाठायींएकाग्रचित्तजोतेणें, ब्रह्मैव ब्रह्मच, गंतव्यं पाविजेतें, ॥ २४ ॥

**दैवमेवापरेयज्ञंयोगिनःपर्युपासते॥**
**ब्रह्माग्नावपरेयज्ञंयज्ञेनैवोपजुह्वति॥ २५॥**

अपरे आणिक, योगिनः कर्मयोगीजेते, दैवमेव इंद्रादिकयजितजा-

चाठायींऐसा, यज्ञं ज्योतिष्टोमादिकातें, पर्युपासते श्रद्धेकरूनअनुष्ठि-
ताहेत, अपरे ज्ञानयोगीजेते, ब्रह्माग्नौ निर्विशेषतत्पदार्थरूपजोअग्नि-
त्याचाठायीं, यज्ञं प्रत्यगात्मात्वंपदार्थातें, यज्ञेनैव तत्पदार्थअभेदेंक-
रून, उपजुव्हति ऐक्यरूपजाणताहेत, ॥ २५ ॥ ॥ ॥

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्येसंयमाग्निषुजुव्हति ॥**
**शब्दादींविषयानन्यइंद्रियाग्निषुजुव्हति ॥ २६ ॥**

अन्ये आणिकनैष्ठिकादिकजेते, संयमाग्निषु इंद्रियनियमाग्निजो-
त्याचाठायीं, श्रोत्रादीनि श्रोत्रादिकऐशींइंद्रियेंजींत्यांतें, जुव्हति नि-
यमचप्रधानऐसेहोऊनराहताहेत, अन्ये गृहस्थादिकजेते, शब्दादी-
न् शब्दादिकऐसे, विषयान् विषयजेत्यांतें, इंद्रियाग्निषु इंद्रियरूप-
अग्नीचाठायीं, जुव्हति विरुद्धविषयनाहींघेत, ॥ २६ ॥ ॥

**सर्वाणींद्रियकर्माणिप्राणकर्माणिचापरे ॥**
**आत्मसंयमयोगाग्नौजुव्हतिज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

अपरे ध्याननिष्ठजेते, ज्ञानदीपिते ज्ञानेंकरूनसोज्वळऐसा, आत्मसं-
यमयोगाग्नौ चित्तैकाग्र्ययोगाग्नीचाठायीं, सर्वाणि सर्वेही, इंद्रिय-
कर्माणि श्रोत्रादिइंद्रियांचीश्रवणादिकवचनादिककर्मेंजींत्यांतें, प्रा-
णकर्माणिच प्राणादिपंचवायुव्यापारजेत्यांतेंही, जुव्हति विलापन-
करिताहेत, ॥ २७ ॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञायोगयज्ञास्तथाऽपरे ॥**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्चयतयःसंशितव्रताः ॥ २८ ॥**

द्रव्ययज्ञाः द्रव्यत्यागरूपयज्ञनिष्ठजेते, तपोयज्ञाः तपस्वीजेते, योग-
यज्ञाःप्राणायामादिअष्टांगयोगनिष्ठजेते, तथापरे तसेचआणिक,
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च वेदाध्ययनआणिज्ञानशास्त्रपरिज्ञानशीलजे-

ते, यतयः प्रयत्नस्वभाववंतऐसे, संशितव्रताः बरींतीक्ष्णकेलींआहेतव्रतेंजीहीं, ॥ २८ ॥ ॥ ॥ ॥

अपानेजुव्हतिप्राणंप्राणेऽपानंतथाऽपरे ॥
प्राणापानगतीरुध्वाप्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

अपाने अपानवृत्तींचाठायीं, प्राणं प्राणवृत्तीतें, जुव्हति पूरकप्राणायामकरिताहेत, प्राणेपानं बाह्यस्थळीं अपानवायुजोत्यातें, जुव्हति रेचक प्राणायामकरिताहेत, तथापरे तैसेंचआणिक, प्राणापानगतीः वायूचेंबहिर्निर्गमनअंतःप्रवेशजोत्यातें, रुध्वा रोधून, प्राणायामपरायणाः कुंभकप्राणायामींतत्परऐसे ॥ २९ ॥ ॥ ७ ॥

अपरेनियताहाराःप्राणान्प्राणेषुजुव्हति ॥
सर्वेऽप्येतेयज्ञविदोयज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

अपरे आणिककोणी, नियताहाराः आहारसंकोचाभ्यासीजेते, प्राणेषु त्याइंद्रियांचाठायीं, प्राणान् शब्दादिविषयांतें, जुव्हति लयकरूनहोमभाविताहेत, एतेसर्वेपि हेसर्वही, यज्ञविदः यज्ञजाणते, यज्ञक्षपितकल्मषाः यज्ञेंकरूनलोपिलींआहेतपापेंजीहींऐसे, ॥ ३० ॥

यज्ञशिष्टामृतभुजोयांतिब्रह्मसनातनं ॥
नायंलोकोऽस्त्ययज्ञस्यकुतोऽन्यःकुरुसत्तम ॥ ३१ ॥

यज्ञशिष्टामृतभुजः यज्ञकरूनउरल्यापदार्थातेंअमृतशब्दवाच्यअन्नातेंभक्षिणारजेते, ब्रह्मसनातनं नित्यस्वरूपब्रह्मजेंत्यातें, यांति पावताहेत, हेकुरुसत्तम अगाकुरुकुळसत्तमा, अयज्ञस्य यज्ञरहितजोत्यास, अयंलोकः हालोकजोतो, नास्ति नाहीं, अन्यः परलोकजोतो, कुतः कैंचा, ॥ ३१ ॥

एवंबहुविधायज्ञावितताब्रह्मणोमुखे ॥

कर्मजान्विद्धितान्सर्वानेवंज्ञात्वाविमोक्ष्यसे॥ ३२॥

बहुविधाः बहुप्रकारकऐसे, यज्ञाः यज्ञजेते, एवं याप्रकारें, ब्रह्मणः वेदजोत्याच्या, मुखे मुखाचाठायीं, वितताः विस्तारले, तान्सर्वान् ते-सर्वयज्ञजेत्यांतें, कर्मजान् कर्मजन्यऐशांतें, विद्धि जाण, एवं याप्र-कारें, ज्ञात्वा ज्ञाननिष्ठहोत्साता, विमोक्ष्यसे संसारापासूनमुक्तहो-शील, ॥ ३२ ॥ ॥ ५ ॥ ॥ ५ ॥

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञःपरंतप ॥
सर्वंकर्माखिलंपार्थज्ञानेपरिसमाप्यते ॥ ३३ ॥

हेपरंतप अगाअर्जुना, द्रव्यमयात् द्रव्यविकारीऐसा, यज्ञात् यज्ञ-जोत्याहून, ज्ञानयज्ञः ज्ञानयज्ञजोतो, श्रेयान् अत्यंतश्रेष्ठहोय, हेपार्थ अगापार्था, सर्वं सर्वऐसें, कर्म कर्मजेतें, अखिलं फलरहितहोत्सातें, ज्ञाने ज्ञानजेंत्याचाठायीं, परिसमाप्यते अंतरंगींहोऊनसंपतें, ॥ ३३॥

तद्विद्धिप्रणिपातेनपरिप्रश्नेनसेवया ॥
उपदेक्ष्यंतितेज्ञानंज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

प्रणिपातेन दीर्घनमस्कारेंकरून, परिप्रश्नेन मीकोणमजबंधकांमुक्ति-कशीइत्यादिकप्रश्नेंकरून, सेवया शुश्रूषेंकरून, तत् तेंज्ञानजेंत्यातें, विद्धि जाण, तत्त्वदर्शिनः अपरोक्षसाक्षात्कारवंतऐसे, ज्ञानिनः ज्ञा-नीजेते, उपदेक्ष्यंति उपदेशेंकरूनसंपादितील, ॥ ३४ ॥

यज्ज्ञात्वानपुनर्मोहमेवंयास्यसिपांडव ॥
येनभूतान्यशेषेणद्रक्ष्यस्यात्मन्यथोमयि ॥ ३५ ॥

हेपांडव अगाअर्जुना, यत् ज्याब्रह्मज्ञानातें, ज्ञात्वा जाणोन, पुनः मागुतीं, एवं पूर्वोक्तप्रकारें, मोहं मोहजोत्यातें, नयास्यसि नपावशी-ल, अथ यानंतर, येन याज्ञानेंकरून, भूतानि पुत्रपौत्रादिजींतीं, अ

शेषेण ब्रह्मादिस्थावरांत, आत्मनि शुद्धत्वंपदार्थाचाठायीं, मयि शुद्धतत्पदार्थमीजोत्यामाझाठायीं, द्रक्ष्यसि पाहशील, ॥ ३५ ॥

अपिचेदसिपापेभ्यःसर्वेभ्यःपापकृत्तमः ॥
सर्वंज्ञानप्लवेनैववृजिनंसंतरिष्यसि ॥ ३६ ॥

त्वं तूंजोतो, सर्वेभ्यःपापेभ्यः सर्वपापकारीजेत्यांहून, पापकृत्तमः अत्यंतपापकारीऐसा, चेदसि जरीआहेसतरी, सर्वंवृजिनं संपूर्णपापातें, ज्ञानप्लवेनैव ज्ञानरूपतारूंजेंतेणेंकरून, संतरिष्यसि बरातरशील, ॥ ३६ ॥

यथैधांसिसमिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ॥
ज्ञानाग्निःसर्वकर्माणिभस्मसात्कुरुतेतथा ॥ ३७ ॥

हेअर्जुन अगाअर्जुना, तथा तैसा, समिद्धः देदीप्यमानऐसा, अग्निः अग्नि जोतो, यथा जसा, ऐधांसि काष्ठादिकांतें, भस्मसात् भस्मभूतऐशांतें, कुरुते करितो, तथा तसा, ज्ञानाग्निः ज्ञानरूपअग्निजोतो, सर्वकर्माणि सर्वकर्मेंजींत्यांतें, भस्मसात् भस्मभूतऐशांतें, कुरुते करितो, ॥ ३७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

नहिज्ञानेनसदृशंपवित्रमिहविद्यते ॥
तत्स्वयंयोगसंसिद्धःकालेनात्मनिविंदति ॥ ३८ ॥

इह याजगाचाठायीं, ज्ञानेन ज्ञानजेंतेणेंशीं, सदृशं सारिखें, पवित्रं पवित्रजेंतें, नविद्यते नाहींच, योगसंसिद्धः योगेंकरूनबरव्यासिद्धीप्रतपावलाहोत्साता, स्वयं आपण, तत् जाल्या ज्ञानातें, कालेन कालेंकरून, आत्मनि आपुल्याठायीं, विंदति जाणतो, ॥ ३८ ॥

श्रद्धावान्लभतेज्ञानंतत्परःसंयतेंद्रियः ॥

ज्ञानंलब्ध्वापरांशांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

श्रद्धावान् गुरुशास्त्रवचनींविश्वासीऐसा, तत्परः तोपरमात्माचउत्कृष्टज्यासऐसा, संयतेंद्रियः बरव्याप्रकारेंइंद्रियेंनेमिलींजेणेंतो, ज्ञानं ज्ञानजेंत्यातें, लभते पावतो, ज्ञानंलब्ध्वा ज्ञानातेंलाभून, अचिरेण शीघ्रच, परांशांतिं कैवल्यमोक्षपदाप्रति, अधिगच्छति पावतोहे, ॥ ३९

अज्ञश्चाश्रद्दधानश्चसंशयात्माविनश्यति ॥
नायंलोकोऽस्तिनपरोनसुखंसंशयात्मनः ॥ ४० ॥

अज्ञः गुरूपदिष्टतत्त्वज्ञाननाहींज्यासतो, च त्यानंतर, अश्रद्दधानः वेदांतगुरुवाक्यविश्वासरहितऐसा, च त्यानंतर, संशयात्मा संशयरूपमनज्याचेंतो, विनश्यति स्वार्थापासूनचवतो, संशयात्मनः संशयात्माजोत्यास, अयंलोकः हालोकजोतो, नास्ति नाहीं, परोपि परलोकही, न नाहीं, सुखंच सुखहीनाहीं, ॥ ४० ॥

योगसंन्यस्तकर्माणंज्ञानसंछिन्नसंशयं ॥
आत्मवंतंनकर्माणिनिबध्नंतिधनंजय ॥ ४१ ॥

हेधनंजय अगाअर्जुना, कर्माणि लोकसंग्रहार्थस्वाभाविकऐशींकर्मेंजीतीं, योगसंन्यस्तकर्माणं ईश्वराराधनेंकरूनटाकिलींकर्मेंजेणें, ज्ञानसंछिन्नसंशयं अकर्त्रात्मकबोधेंकरूनगेलादेहाभिमानज्याचातो, आत्मवंतं प्रमादरहित बुद्धिज्याचीअसाजोत्यातें, ननिबध्नंति नाहींबांधीत, ॥ ४१ ॥ ॥ ७ ॥

तस्मादज्ञानसंभूतंहृत्स्थंज्ञानासिनाऽत्मनः ॥
छित्वैनंसंशयंयोगमातिष्ठोत्तिष्ठभारत ॥ ४२ ॥

हेभारत अगाअर्जुना, तस्मात् त्याकारणास्तव, त्वं तूं, आत्मनः आपुल्या, अज्ञानसंभूतं अज्ञानेंकरूनउत्पन्नझालाऐसा, हृत्स्थं बुद्धीचा-

ठायींस्थिरऐसा, एनंसंशयं हासंशयजोयातें, ज्ञानासिना ज्ञानखड्गें-करून, छित्वा छेदून, योगं कर्मयोगजोत्यातें, आतिष्ठ आश्रयकर उत्तिष्ठ युद्धाकारणेंऊठ, ॥ ४२ ॥

ओंतत्सदितिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सुब्रह्मविद्यायां योगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादेज्ञानविज्ञानयो गोनामचतुर्थोध्यायः ४



# पंचमाध्यायप्रारंभः



श्रीगणेशायनमः ॥ अज्ञानजन्यसंशयातेंज्ञानखड्गेंछेदूनकर्मयोगक-रींह्मणतांचयेथपूर्वपरविरोधमानीतहोत्सातांअर्जुनआशंकाकरितो,॥

अर्जुनउवाच संन्यासंकर्मणांकृष्णपुनर्योगंचशं
ससि॥ यच्छ्रेयएतयोरेकंतन्मेब्रूहिसुनिश्चितं ॥ १ ॥

हेकृष्ण अगाकृष्णा, त्वं तूं, कर्मणां कर्मेंजींत्यांचा, संन्यासं बरव्याप्रकारेंत्यागजोत्यातें, पुनः मागुतेन, योगंच कर्मयोगजोत्यातेंही, शंससि सांगतोसपरंतु, एतयोः यांमध्यें, यच्छ्रेयः जेंप्रशस्तऐसें, एकं एकजेंत्यातें, तत्तें, सुनिश्चितं निश्चयरूपऐशातें, मे मजकारणें, ब्रूहि बोल, ॥ १ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

श्रीभगवानुवाच संन्यासःकर्मयोगश्चनिःश्रेय
सकरावुभौ॥ तयोस्तुकर्मसंन्यासात्कर्मयोगोवि
शिष्यते॥ २ ॥

संन्यासः सर्वत्यागजोतो, कर्मयोगश्च कर्तृत्वफलापेक्षारहितकर्मयोगजोतो, उभौ दोन्हीही, निःश्रेयसकरौ अकल्याणकारकमोक्षहोयतोंपर्यंत, तयोः तेजेसंन्यासकर्मयोगत्यांमध्यें, कर्मसंन्यासात् कर्मत्यागापेक्षां, कर्मयोगः कर्मयोगजोतो, विशिष्यते श्रेष्ठहोय, ॥ २ ॥

ज्ञेयःसनित्यसंन्यासीयोनद्वेष्टिनकांक्षति॥
निर्द्वंद्वोहिमहाबाहोसुखंबंधात्प्रमुच्यते॥ ३ ॥

हेमहाबाहो अगाअर्जुना, यः जो, नद्वेष्टि नाहींद्वेषकरित, नकांक्षति नाहींइच्छित, सः तो, नित्यसंन्यासी सर्वदासंन्यासीऐसा, ज्ञेयः जाणावा, हि ज्याकारणास्तव, निर्द्वंद्वः सुखदुःखादिकद्वंद्वातीतजोतो,

बंधात् बंधापासून, सुखं अनायासेंकरून, प्रमुच्यते मुक्तहोतो, ॥ ३ ॥

सांख्ययोगौपृथग्बालाःप्रवदंतिनपंडिताः ॥
एकमप्यास्थितःसम्यगुभयोर्विंदतेफलम् ॥ ४ ॥

बालाः अज्ञानीजेते, सांख्ययोगौ संन्यासआणिकर्मयोगयांतें, पृथक् वेगळेऐशांतें, प्रवदंति बोलताहेत, पंडिताः ज्ञानीजेते, नवदंति नाहींबोलत, एकमपि दोंमध्येंएकातेंही, सम्यक् बरव्याप्रकारें, आस्थितः आचरितहोत्साता, उभयोः दोंहींचेंही, फलंफलजेंत्यातें विंदतेपावतो ॥ ४ ॥ ॥ . ॥ ॥ ॥ ॥

यत्सांख्यैःप्राप्यतेस्थानंतद्योगैरपिगम्यते ॥
एकंसांख्यंचयोगंचयःपश्यतिसपश्यति ॥ ५ ॥

यत्स्थानं कैवल्यजेतें, सांख्यैः ज्ञाननिष्ठजेतीहीं, प्राप्यते पाविजेतें, योगैरपि कर्मयोगीजेतीहींही, तत् तेंकैवल्यजेतें, गम्यते चित्तशुद्धिद्वारापरंपरेंकरूनपाविजेतें, सांख्यंच ज्ञानजेंत्यातें, योगंच ईश्वरार्थकर्मजेंत्यातें, एकं फळरूपेंकरूनएकऐशातें, यः जो, पश्यति पाहतो, सः तो, पश्यति पाहतो, ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥

संन्यासस्तुमहाबाहोदुःखमाप्तुमयोगतः ॥
योगयुक्तोमुनिर्ब्रह्मनचिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

हेमहाबाहो अगाअर्जुना, संन्यासस्तु संन्यासजोतोतरी, अयोगतः कर्मयोगावांचून, आप्तुं पावावयाकारणें, दुःखं दुःखहोय, योगयुक्तः कर्मयोगेंकरूनयुक्तऐसा, मुनिः शुद्धांतःकरणसंन्यासीजोतो, नचिरेण शीघ्रच, ब्रह्म मोक्षपदाप्रति, अधिगच्छति पावतो, ॥ ६ ॥

योगयुक्तोविशुद्धात्माविजितात्माजितेंद्रियः ॥
सर्वभूतात्मभूतात्माकुर्वन्नपिनलिप्यते ॥ ७ ॥

योगयुक्तः योगेंकरूनयुक्तऐसा, विशुद्धात्मा विशुद्धअंतःकरणऐसा, विजितात्मा स्ववशीकृतदेहऐसा, जितेंद्रियः जिंकिलींआहेतइंद्रियें-जेणेंतोऐसा, सर्वभूतात्मभूतात्मा जडाअजडातेंआत्मरूपपाहणारऐ-सा, कुर्वन्नपि परदृष्टींकरूनकरितोऐसादिसलाजरीतरी, नलिप्यते आपणलिप्तहोतनाहीं, ॥ ७ ॥

नैवकिंचित्करोमीतियुक्तोमन्येततत्त्ववित् ॥
पश्यन्शृण्वन्स्पृशन्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्
श्वसन् ॥ ८ ॥

युक्तः कर्मयोगयुक्तहोत्साता, तत्त्ववित् कर्मैंकरूनतत्त्वज्ञजोतो, पश्यन् पाहतहोत्साता, शृण्वन् ऐकतहोत्साता, स्पृशन् स्पर्शकरितहोत्साता, जिघ्रन् अवघ्राणकरितहोत्साता, अश्नन् भक्षितहोत्साता, गच्छन् जाणारऐसा, स्वपन् निद्रितहोत्साता, श्वसन् श्वासटाकितोऐसा, ॥ ८ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ॥
इंद्रियाणींद्रियार्थेषुवर्त्ततइतिधारयन् ॥ ९ ॥

प्रलपन् बोलणारऐसा, विसृजन् मळमूत्रत्यागकरणारऐसा, गृह्णन् घेणारऐसा, उन्मिषन् पाहणारऐसा, निमिषन्नपि नेत्रआच्छादितहोत्साताही, इंद्रियाणि इंद्रियेंजीत्यांतें, इंद्रियार्थेषु स्वस्वविषयांचाठायीं, वर्तंते वर्तताहेत, इति असें, धारयन् निश्चयकरून, अहं मी, किंचित् काहीं, नैवकरोमि नाहींचकरीत, इति याप्रकारें, मन्यते मानितो, ॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

ब्रह्मण्याधायकर्माणिसंगंत्यक्त्वाकरोतियः ॥
लिप्यतेनसपापेनपद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥

ब्रह्मणि ईश्वरविषयीं, आधाय समर्पून, संगं फलाभिलाषजोत्यातें, त्यक्त्वा टाकून, कर्माणि कर्मेंजींत्यांतें, करोति करितो, सः तो, अंभसा उदकेंकरून, नलिप्यते नाहींलिप्तहोतऐसें, पद्मपत्रमिव कमलपत्राचेपरी, पापेन पापेंकरूननाहींलिप्तहोत, ॥ १० ॥ ॥ ॥

**कायेनमनसाबुद्ध्याकेवलैरिंद्रियैरपि ॥**
**योगिनःकर्मकुर्वंतिसंगंत्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥**

योगिनः योगीजेते, संगंत्यक्त्वा फलाभिलाषातेंटाकून, कायेन शरीरेंकरून, मनसा ध्यानेंकरून, बुद्ध्या तत्त्वनिश्चयेंकरून, केवलैः कर्माभिनिवेशितनव्हेतऐशीं, इंद्रियैरपि इंद्रियेंजींतीहींकरूनही, आत्मशुद्धये अंतःकरणशुद्धीकारणें, कर्म कर्मजेंत्यातें, कुर्वंति करिताहेत, ॥ ११ ॥

**युक्तःकर्मफलंत्यक्त्वाशांतिमाप्नोतिनैष्ठिकीं ॥**
**अयुक्तःकामकारेणफलेसक्तोनिबध्यते ॥ १२ ॥**

युक्तः ईश्वरनिष्ठजोतो, कर्मफलं कर्मफलजेंत्यातें, त्यक्त्वा टाकूनकर्मकरितहोत्साता, नैष्ठिकीं निष्ठेपासूनउत्पन्नऐशी, शांति मोक्षजोत्यातें, आप्नोति पावतो, अयुक्तः मूढजोतो, कामकारेण कामेंकरूनप्रवृत्तिनिवृत्तीकरून, फलेसक्तः फलाचाठायींआसक्तहोत्साता, निबध्यते अत्यंतबंधातेंपावतो, ॥ १२ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**सर्वकर्माणिमनसासंन्यस्यास्तेसुखंवशी ॥**
**नवद्वारेपुरेदेहीनैवकुर्वन्नकारयन् ॥ १३ ॥**

वशी इंद्रियनिग्रहवान्जोतो, मनसा विवेकेंकरून, सर्वकर्माणि सर्वकर्मेंजींत्यांतें, संन्यस्य बरव्याप्रकारेंठेऊन, नवद्वारे नवआहेतद्वारेंज्यासऐसें, पुरे नगराचेपरीअहंभाववर्जितदेहजोत्याचाठायीं, देही देह-

धारीजोतो, नैवकुर्वन् नकरीतहोत्साता, नकारयन् नकरवितहोत्साता, सुखंसुखरूप, आस्ते राहतो, ॥ १३ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**नकर्तृत्वंनकर्माणिलोकस्यसृजतिप्रभुः॥**
**नकर्मफलसंयोगंस्वभावस्तुप्रवर्त्तते॥ १४॥**

प्रभुः ईश्वरजोतो, लोकस्य जीवसमुदायास, कर्तृत्वं कर्तेपणजेंत्यातें, नसृजति नाहींनिर्मीत, कर्माणि कर्मेंजींत्यांतें, नसृजति नाहींघडवीत, कर्मफलसंयोगं कर्माच्याफळाचीप्राप्तीतेंही, नसृजति नाहींउत्पादीत, किंतु तरकाय, स्वभावस्तु स्वभावम्हणजेअविद्याजेते, प्रवर्तते करितो, ॥ १४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**नादत्तेकस्यचित्पापंनचैवसुकृतंविभुः॥**
**अज्ञानेनावृतंज्ञानंतेनमुह्यंतिजंतवः॥ १५॥**

विभुः आप्तकामऐसा, अतएव यास्तवच, कस्यचित् कोणासही, पापं पापजेंत्यातें, नआदत्ते नाहींदेत, च त्यानंतर, सुकृतं पुण्यजेंत्यातें, नैवआदत्ते नाहींघेत, अज्ञानेन अज्ञानेंकरून, ज्ञानं ज्ञानजेतें, आवृतं आच्छादिलेंआहे, तेन तेणेंऐक्यकरून, जंतवः प्राणीजेते, मुह्यंति मोहातेपावतात ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**ज्ञानेनतुतदज्ञानंयेषांनाशितमात्मनः॥**
**तेषामादित्यवज्ज्ञानंप्रकाशयतितत्परं॥ १६॥**

येषांतु ज्यांचेंतरी, तदज्ञानं तेंअज्ञानजेतें, आत्मनः परमात्माजोत्याच्या, ज्ञानेन ज्ञानजेंतेणेंकरून, नाशितं नाशातेंपावलें, तेषां त्यांचें, तत् तें, परं उत्कृष्टऐसें, ज्ञानं ज्ञानजेंतें, आदित्यवत् सूर्याचेपरी, प्रकाशयति प्रकाशातेंपावतें, ॥ १६ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः॥**

गच्छंत्यपुनरावृत्तिंज्ञाननिर्धूतकल्मषाः॥ १७॥

तद्बुद्धयः त्यापरमेश्वरींआहेबुद्धिज्यांचीऐसे, तदात्मानः त्याचाठायींमनआहेज्यांचेंऐसे, तन्निष्ठाः त्याचाठायीं निष्ठातात्पर्यज्यांसतेऐसे, तत्परायणाः तोचिआहेमोठाआश्रयज्यांसऐसे, ज्ञाननिर्धूतकल्मषाः ज्ञानेंकरूनधुपोननिःशेषझालींआहेतरागादिकपातकेंज्यांचींते, अपुनरावृत्ति शाश्वतमोक्षपदाप्रति, गच्छंति पावताहेत,॥ १७॥

विद्याविनयसंपन्नेब्राह्मणेगविहस्तिनि॥
शुनिचैवश्वपाकेचपंडिताःसमदर्शिनः॥ १८॥

पंडिताः ज्ञानीजेते, विद्याविनयसंपन्ने विद्येकरूनआणिनम्रतेकरून संपन्नऐसा, ब्राह्मणे ब्राह्मणजोत्याचाठायीं, गवि गाईचाठायीं, हस्तिनि हस्तीचाठायीं, शुनिचैव श्वानाचाठायीं, श्वपाकेच श्वपाचकजोत्याचाठायीं, समदर्शिनः ब्रह्मरूपपाहणारऐसे, भवंति होताहेत, १८

इहैवतैर्जितःसर्गोयेषांसाम्येस्थितंमनः॥
निर्दोषंहिसमंब्रह्मतस्माद्ब्रह्मणितेस्थिताः॥ १९॥

येषां ज्यांचें, मनः मनजेतें, साम्ये समत्वाचाठायीं, स्थितं राहिलें, तैः तीहीं, इहैव जीवंतअसतांच, सर्गः संसारजोतो, जितः जिकिला, हि ज्याकारणास्तव, समं समऐसें, निर्दोषं दोषरहितऐसें, ब्रह्म ब्रह्मजेतें, तस्मात् त्याकारणास्तव, ते समवृत्तिपुरुषजेते, ब्रह्मणि ब्रह्मजेंत्याचाठायीं, स्थिताः राहिलेआहेत,॥ १९॥

नप्रहृष्येत्प्रियंप्राप्यनोद्विजेत्प्राप्यचाप्रियं॥
स्थिरबुद्धिरसंमूढोब्रह्मविद्ब्रह्मणिस्थितः॥ २०॥

यः जो, प्रियं प्रियजेंत्यातें, प्राप्य पावून, नप्रहृष्येत् हर्षातेंनपावतो,

च तेसेंच, अप्रियं अप्रियजेंत्यातें, प्राप्य पावून, नोद्विजेत् नाहींउ-द्वेगातेंपावत, स्थिरबुद्धिः स्थिरआहेबुद्धिज्याचीऐसा, असंमूढः बर-व्याप्रकारेंमोहातेंनाहींपावतऐसा, ब्रह्मवित् ब्रह्मवेत्ताजोतो, ब्रह्मणि ब्रह्मजेंत्याचाठायीं, स्थितः राहिला, ॥ २० ॥

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्माविंदत्यात्मनियत्सुखं ॥
सब्रह्मयोगयुक्तात्मासुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

बाह्यस्पर्शेषु शब्दादिबाह्यविषयांचाठायीं, असक्तात्मा नाहींआसक्त-मनज्याचेंतो, यत् जें, आत्मनि अंतःकरणाचाठायीं, सुखं सुखजें-त्यातें, विंदति पावतो, सः तो, ब्रह्मयोगयुक्तात्मा ब्रह्मसमाधियुक्तअं-तःकरणज्याचेंतो, अक्षय्यं अविनाशिऐसें, सुखं सुखजेंत्यातें, अश्नुते पावतो, ॥ २१ ॥ ॥ ५ ॥

येहिसंस्पर्शजाभोगादुःखयोनयएवते ॥
आद्यंतवंतःकौंतेयनतेषुरमतेबुधः ॥ २२ ॥

हेकौंतेय अगाअर्जुना, हि निश्चयेंकरून, ये जे, संस्पर्शजाः विषय-जन्यऐसे, भोगाः भोगजेते, आद्यंतवंतः उत्पत्तिनाशवंतऐसे, तेदुःख-योनयएव तेदुःखकारकचहोत, बुधः ज्ञानीजोतो, तेषु त्याविषयांचा-ठायीं, नरमते नाहींक्रीडाकरीत, ॥ २२ ॥

शक्नोतीहैवयःसोढुंप्राक्शरीरविमोक्षणात् ॥
कामक्रोधोद्भवंवेगंसयुक्तःससुखीनरः २३ ॥

यः जो, शरीरविमोक्षणात् मरणाहून, प्राक् पूर्वी, कामक्रोधोद्भवं का-मक्रोधापासूनउद्भवलाऐसा, वेगं वेगजोत्यातें, इहैव वेगोद्भवसमयीं च, सोढुं साहावयाकारणें, शक्नोति समर्थहोतो, सयुक्तः तोचयोग-युक्तहोय, सनरः तोचपुरुषहोय, ससुखी तोसुखीहोय, ॥ २३ ॥

योऽतःसुखोऽतरारामस्तथांऽतर्ज्योतिरेवयः॥
सयोगीब्रह्मनिर्वाणंब्रह्मभूतोऽधिगच्छति॥२४॥

यः जो, अंतःसुखः अंतरींसुखआहेज्यासऐसा, अंतराराम: अंतरीं-आहेविश्रांतिज्यासतोऐसा, तथा तैसाच, यः जो, अंतर्ज्योतिरेव अंतरींचआहेविज्ञानज्यास, सः तो, योगी चित्तनिग्रहज्यासतो, ब्रह्मभूतः ब्रह्मचहोत्साता, ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मरूपजेंत्याप्रति, अधिगच्छति पावतो, ॥ २४ ॥ ॥ ॥ ७ ॥ ॥

लभंतेब्रह्मनिर्वाणमृषयःक्षीणकल्मषाः॥
छिन्नद्वैधायतात्मानःसर्वभूतहितेरताः॥ २५॥

क्षीणकल्मषाः निष्पापऐसे, छिन्नद्वैधाः निःसंशयऐसे, यतात्मानः निग्रहीतमनऐसे, सर्वभूतहितेरताः प्राणिमात्रांचाठायींहितींरतऐसे, ऋषयः ऋषिजेते, ब्रह्मनिर्वाणं मोक्षातें, लभंते पावताहेत, ॥ २५ ॥

कामक्रोधवियुक्तानांयतीनांयतचेतसाम्॥
अभितोब्रह्मनिर्वाणंवर्ततेविदितात्मनां॥ २६॥

कामक्रोधवियुक्तानां कामक्रोधरहितऐसे, यतीनां संन्यासीऐसे, यतचेतसां जितचित्तऐसे, विदितात्मनां जाणिलाआहेआत्माजींहीं-त्यांस, अभितः जीवन्मुक्तिदेहमुक्तिकाळींही, ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मींलीनताजेते, वर्तते होते, ॥ २६ ॥ ॥ ॥ ७ ॥

स्पर्शान्कृत्वाबहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरेभ्रुवोः॥
प्राणापानौसमौकृत्वानासाभ्यंतरचारिणौ॥२७॥

बाह्यान् बहिर्बाह्यऐसे, स्पर्शान् विषयजेंत्यांतें, बहिः बाहेर, कृत्वा करून, प्राणापानौ प्राणआणिअपानजेंत्यांतें, नासाभ्यंतरचारिणौ नासिकांतरींसंचरणारऐसे, समौ समऐशांतें, चक्षुश्चैव नेत्रजेंत्यांतेंही,

भ्रुवोःअंतरेभ्रूमध्यभागाचाठायीं, कृत्वा करून, ॥ २७ ॥

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः॥
विगतेच्छाभयक्रोधोयःसदामुक्तएवसः॥ २८॥

यतेंद्रियमनोबुद्धिः नेमिलींआहेतइंद्रियेंमनबुद्धिजेणेंऐसा, मोक्षपरायणः मोक्षचआहेपरमस्थानज्याचेंतोऐसा, विगतेच्छाभयक्रोधः गेलेआहेतइच्छाभयक्रोधज्यापासूनतोऐसा, यः जो, मुनिः मननशीलऐसा, सः तो, सदा जिवंतअसतांही, मुक्तएव मुक्तचऐसाजाणावा, ॥ २८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

भोक्तारंयज्ञतपसांसर्वलोकमहेश्वरं॥
सुहृदंसर्वभूतानांज्ञात्वामांशांतिमृच्छति॥२९॥

यज्ञतपसां यज्ञतपेंजींत्यांचा, भोक्तारं पाळिताऐसा, सर्वलोकमहेश्वरं सर्वलोकांचामोठाईश्वरऐसा, सर्वभूतानां सकलप्राणिमात्रांचा, सुहृदं निरुपाधिकबंधुऐसा, मां मीजोब्रह्मरूपत्यामजप्रति, ज्ञात्वा जाणोन, शांतिं मोक्षातें, ऋच्छति पावतो, ॥ २९ ॥

ओंतत्सदितिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सुब्रह्मविद्यायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादेसंन्यासयोगोनाम पंचमोऽध्यायः॥ ५॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

---

# षष्ठाध्यायप्रारंभः



पूर्वाध्यायींयोगसंक्षेपेंकरूनश्लोकत्रयींबोलिलात्याच्याविस्तारार्थ-
पुढीलअध्यायाचाआरंभ ॥

**श्रीभगवानुवाच अनाश्रितःकर्मफलंकार्यंकर्मकरोतियः॥ ससंन्यासीचयोगीचननिरग्निर्नचाक्रियः॥ १ ॥**

यः जो, कर्मफलं कर्मफलातें, अनाश्रितः निरपेक्षितऐसा, कार्यं विहितकर्तव्यऐसें, कर्म कर्मजेंत्यातें, करोति करितो, ससंन्यासी तोसंन्यासीहोय, योगीच योगीहीहोय, ननिरग्निः निरग्निनव्हे, नचाक्रियः अक्रियहीनव्हे, ॥ १ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**यंसंन्यासमितिप्राहुर्योगंतंविद्धिपांडव ॥
नह्यसंन्यस्तसंकल्पोयोगीभवतिकश्चन ॥ २ ॥**

हेपांडव अगाअर्जुना, यं ज्यातें, संन्यासमिति संन्यासऐशातें, प्राहुः बोलताहेत, त्वं तूं, तं त्यातें, योगं योगऐशातें, विद्धि जाण, हि निश्चयेंसी, कश्चन कोणीही, असंन्यस्तसंकल्पः नाहींचटाकिलासंकल्पजेणेंऐसा, योगी योगीजोतो, नभवति नाहींहोत, ॥ २ ॥

**आरुरुक्षोर्मुनेर्योगंकर्मकारणमुच्यते ॥
योगारूढस्यतस्यैवशमःकारणमुच्यते ॥ ३ ॥**

योगं योगजोत्यातें, आरुरुक्षोः अभ्यासकरणारऐसा, मुनेः मननशीलजोत्यास, कर्म कर्मजेतें, कारणं चित्तशुद्धिकारणऐसें, उच्यते बोलिजेतें, योगारूढस्य योगप्राप्तऐसा, तस्यैव त्यासच, शमः शांतिजेते, कारणं साधनकारणजेतें, उच्यते बोलिजेतें, ॥ ३ ॥

यदाहिनेंद्रियार्थेषुनकर्मस्वनुषज्जते ॥
सर्वसंकल्पसंन्यासीयोगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

हि निश्चयेंसी, सर्वसंकल्पसंन्यासी सर्वसंकल्पांतेंटाकणेंहाचआहेस्वभावज्याचाऐसाजोतो, यदा जेव्हां, इंद्रियार्थेषु शब्दादिविषयांचाठायीं, नअनुषज्जते नाहींआसक्तहोत, तदा तेव्हां, योगारूढः योगपावलाऐसा, उच्यते बोलिजेतो, ॥ ४ ॥

उद्धरेदात्मनात्मानंनात्मानमवसादयेत् ॥
आत्मैवत्यात्मनोबंधुरात्मैवरिपुरात्मनः ॥ ५ ॥

आत्मना विवेकयुक्तमनेंकरून, हि ज्याकारणास्तव, आत्मानं आपणजीवजोत्यातें, उद्धरेत् संसारापासूनउद्धरावें, आत्मानं आपणातें, नअवसादयेत् अधोगतीसनन्यावें, हि ज्याकारणास्तव, आत्मनः-आपणास, आत्मैव विवेकयुक्तआपणच, बंधुः उपकारीहोय, आत्मैव अहंकारयुक्तआपणच, रिपुरात्मनः आपलारिपुह्मणजेशत्रुआपणचहोय, ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ५ ॥

बंधुरात्मात्मनस्तस्ययेनात्मैवात्मनाजितः ॥
अनात्मनस्तुशत्रुत्वेवर्त्तेतात्मैवशत्रुवत् ॥ ६ ॥

येन जेणेंआत्मबुद्धिकरून, आत्मैव ज्ञानात्माजोतो, जितः संपादिला, तस्य त्याचा, आत्मनः बुद्धीससाधनजीवात्माजोत्याचा, आत्मा तद्रूपआत्माजोतो, बंधुः बंधुत्वेंवर्ततो, अनात्मनः अज्ञानरूपजोत्याच्या, शत्रुत्वे वैरभावाचाठायीं, आत्मैव आपणच, शत्रुवत् शत्रूचेपरी, वर्तेत वर्ततो, ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

जितात्मनःप्रशांतस्यपरमात्मासमाहितः ॥
शीतोष्णसुखदुःखेषुतथामानापमानयोः ॥ ७ ॥

जितात्मनः जिंकिलेंआहेअंतःकरणजेणेंऐसा, प्रशांतस्य अत्यंतशां-तजोत्यास, शीतोष्णसुखदुःखेषु शीतउष्णसुखदुःखेंजींत्यांचाठायीं, तथा तसाच, मानापमानयोः मानअपमानजेतेअसतां, परमात्मा स्वप्रकाशज्ञानस्वभावऐसा, समाहितः साक्षात्आत्मभावेंवर्ततो,॥७॥

ज्ञानविज्ञानतृप्तात्माकूटस्थोविजितेंद्रियः॥
युक्तइत्युच्यतेयोगीसमलोष्टाश्मकांचनः॥८॥

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा शास्त्रजन्यआणिअनुभवज्ञानइहींकरूनतृप्तआहेअंतःकरणज्याचेंऐसा, कूटस्थः निर्विकारऐसा, विजितेंद्रियः विशेषेंकरूनजिंकिलींआहेतइंद्रियेंजेणेंतोऐसा, समलोष्टाश्मकांचनः समआहेतढेकुळेंपाषाणसुवर्णज्यासतोऐसा, योगी योगीजोतो, युक्तइत्युच्यते योगारूढऐसाबोलिजेतो,॥ ८ ॥

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु॥
साधुष्वपिचपापेषुसमबुद्धिर्विशिष्यते॥९॥

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु सुहृन्नामउपकारेंविणउपकारकर्ता मित्रनामस्नेहेंकरूनउपकारकर्ता अरिनामघातकर्ता उदासीननामइच्छारहित मध्यस्थनामउभयहितकर्ता द्वेष्यनामद्वेषासकारण बंधुनामसंबंधीइत्यादिकांचाठायीं, अपिचसाधुषु शास्त्रानुसारीजेत्यांचाठायीं, पापेषु निषिद्धकारीजेत्यांचाठायीं, अपिच इतरांचाठायीं, समबुद्धिः रागद्वेषशून्यबुद्धिज्याचीतोऐसा, विशिष्यते सर्वोत्कृष्टहोतो,॥ ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

योगीयुंजीतसततमात्मानंरहसिस्थितः॥
एकाकीयतचित्तात्मानिराशीरपरिग्रहः॥१०॥

एकाकी अद्वितीयऐसा, यतचित्तात्मा नेमिलेंआहेअंतःकरणआणिशरीरजेणें, निराशीः नेमिलीआहेतृष्णाज्याचीतोऐसा, अपरिग्रहः

परिग्रहशून्यऐसा, रहसि गिरिगुहाचाठायीं, स्थितः राहिलाहोत्साता, योगी योगारूढजोतो, आत्मानं आपणातें, सततं निरंतर, युंजीत एकाग्रकरो, ॥ १० ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

शुचौदेशेप्रतिष्ठाप्यस्थिरमासनमात्मनः॥
नात्युच्छ्रितंनातिनीचंचैलाजिनकुशोत्तरं॥ ११॥

नात्युच्छ्रितं अत्यंतउंचनव्हेऐसें, नातिनीचं अत्यंतनीचनव्हेऐसें, चैलाजिनकुशोत्तरं कुशव्याघ्रांबरवरवस्त्रऐसें, स्थिरं निश्चलऐसें, आत्मनः आपुलें, आसनं आसनजेंत्यातें, शुचौदेशे शुद्धभूमीचाठायीं, प्रतिष्ठाप्य ठेवून, ॥ ११ ॥ ॥ ॥ ॥ ॥

तत्रैकाग्रंमनःकृत्वायतचित्तेंद्रियक्रियः॥
उपविश्यासनेयुंज्याद्योगमात्मविशुद्धये॥ १२॥

तत्रआसने त्याआसनाचाठायीं, उपविश्य बसोन, यतचित्तेंद्रियक्रियः मनेंनेमिल्याआहेतचित्तइंद्रियांच्याक्रियाजेणेंऐसा, मनः मनजेंत्यातें, एकाग्रं रजतमोवृत्तिरहितसत्त्वाधिक्यऐशातें, कृत्वा करून, आत्मविशुद्धये अंतःकरणाच्यानिर्मळतेकारणें, योगं समाधिजेतीतें, युंज्यात् अभ्यासावें, ॥ १२ ॥ ॥ ॥ ॥ ॥

समंकायशिरोग्रीवंधारयन्नचलंस्थिरः॥
संप्रेक्ष्यनासिकाग्रंस्वंदिशश्चानवलोकयन्॥ १३॥

कायशिरोग्रीवं देहमध्यमस्तककंठयांतें, समं अवक्रऐसें, अचलं निश्चलऐसें, धारयन् धरितहोत्साता, स्थिरः स्थिरऐसा, स्वं आपुलें, नासिकाग्रं नासिकाग्रजेंत्यातें, संप्रेक्ष्य पाहून, दिशश्च दिशाज्यात्यांतें, अनवलोकयन् नपाहातहोत्साता, ॥ १३ ॥

प्रशांतात्माविगतभीर्ब्रह्मचारिव्रतेस्थितः॥

मनःसंयम्यमच्चित्तोयुक्तआसीतमत्परः ॥ १४ ॥

प्रशांतात्मा अत्यंतशांतमनऐसा, विगतभीः निर्भयऐसा, ब्रह्मचारिव्रते गुरुसेवाभिक्षान्नभोजनादिव्रताचाठायीं, स्थितः राहिलाऐसा, मनः मनोवृत्तिजीतीतें, संयम्य उपसंहारकरून, मच्चित्तः मीपरमेश्वरजोत्यामाझाठायींआहेचित्तज्याचेंतोऐसा, मत्परः मीउत्कृष्टज्यासऐसा, युक्तः एकाग्रहोत्साता, आसीत बसो, ॥ १४ ॥

युंजन्नेवंसदात्मानंयोगीनियतमानसः ॥
शांतिंनिर्वाणपरमांमत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥

नियतमानसः नेमिलेंचित्तऐसा, योगी ध्यानयोगीजोतो, एवं पूर्वोक्तप्रकारें, आत्मानं अंतःकरणजेंत्यातें, सदा निरंतर, युंजन् समाधान करून, निर्वाणपरमां मोक्षनिष्ठाआहेजीसऐशी, मत्संस्थां मदधीनऐशी, शांतिं उपरतीतें, अधिगच्छति पावतो, ॥ १५ ॥

नात्यश्नतस्तुयोगोऽस्तिनचैकांतमनश्नतः ॥
नचातिस्वप्नशीलस्यजाग्रतोनैवचार्जुन ॥ १६ ॥

हेअर्जुन अगाअर्जुना, अत्यश्नतस्तु आपुल्याआहाराहूनअधिकभक्षिणारजोत्यास, योगः योगजोतो, नास्ति नाहीं, एकांतं अत्यंत, अनश्नतः निराहारीजोत्यासही, नच नाहीं, अतिस्वप्नशीलस्य अत्यंतनिद्राशीलजोत्यास, नच नाहीं, जाग्रतः अत्यंतजागतोजोत्यास, नचैव नाहींच, ॥ १६ ॥

युक्ताहारविहारस्ययुक्तचेष्टस्यकर्मसु ॥
युक्तस्वप्नावबोधस्ययोगोभवतिदुःखहा ॥ १७ ॥

युक्ताहारविहारस्य परिमितआहेभोजनआणिसंचारज्यासतोऐसा,

कर्मसु कर्मांचाठायीं, युक्तचेष्टस्य नियतकालआहेतचेष्टाज्यासऐसा, युक्तस्वमावबोधस्य निद्राजागरणआहेपरिमितज्यासऐसात्यास, दुःखहा संसारदुःखनाशकऐसा, योगः योगजोतो, भवति होतो, ॥ १७॥

**यदाविनियतंचित्तमात्मन्येवावतिष्ठते ॥**
**निःस्पृहःसर्वकामेभ्योयुक्तइत्युच्यतेतदा ॥ १८ ॥**

यदा ज्याकाळीं, विनियतं अत्यंतएकाग्रतेप्रतिपावलेंऐसें, चित्तं चित्तजेतें, आत्मन्येवावतिष्ठते बाह्यचिंताटाकूनस्वरूपींचस्थितीतेंपावते, तदा तेकाळीं, सर्वकामेभ्यः दृष्टादृष्टविषयांपासून, निःस्पृहः गेलीइच्छाज्याचीतोऐसा, युक्तः समाधिस्थऐसा, इति याप्रकारें, उच्यते बोलिजेतो, ॥ १८ ॥ ॥ ॥ ॥

**यथादीपोनिवातस्थोनेंगतेसोपमास्मृता ॥**
**योगिनोयतचित्तस्ययुंजतोयोगमात्मनः ॥ १९ ॥**

यथा जैसा, दीपः दीपजोतो, निवातस्थः वायुरहितस्थानींअसणाराऐसा, नेंगते चलनपावतनाहीं, यतचित्तस्य निरोधिल्याचित्तवृत्तिज्याच्यातोऐसा, आत्मनः आपला, योगं समाधियोगजोत्यातें, युंजतः अभ्यासिताऐसा, योगिनः योगीजोत्यास, सा तीऐशी, उपमा दृष्टांतेंकरूनउपमाजेते, स्मृता चिंतिली, ॥ १९ ॥ ॥

**यत्रोपरमतेचित्तंनिरुद्धंयोगसेवया ॥**
**यत्रचैवात्मनाऽत्मानंपश्यन्नात्मनितुष्यति ॥ २० ॥**

योगसेवया योगाभ्यासेंकरून, निरुद्धं आवरिलेंहोत्सातें, यत्र जेथें, चित्तं चित्तजेतें, उपरमते शांतहोतें, यत्रचैव जेथेंच, आत्मना अंतःकरणवृत्तीकरून, आत्मानं प्रत्यगभिन्नपरमात्माजोत्यातें, आत्मनि आपुल्याठायीं, पश्यन् अनुभवीतहोत्साता, तुष्यति संतोषातेंपावतो, ॥ २० ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

सुखमात्यंतिकंयत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियं ॥
वेत्तियत्रनचैवायंस्थितश्चलतितत्त्वतः ॥ २१ ॥

यत् जें, आत्यंतिकंसुखं अत्यंतसुखजेंतें, बुद्धिग्राह्यं सात्विकअंतःकरणवृत्तीनेंघेइजेतेंऐसें, तत् तें, अतींद्रियं इंद्रियांतेंअगोचरऐसें, यत्रचैव जेथेंच, स्थितः राहिलाहोत्साता, वेत्ति जाणतो, अयं हायोगी, तत्त्वतः स्वरूपापासून, नचलति नाहींचचळणपावत, ॥ २१ ॥

यंलब्ध्वाचापरंलाभंमन्यतेनाधिकंततः ॥ य
स्मिन्स्थितोनदुःखेनगुरुणापिविचाल्यते ॥ २२ ॥

यं ज्यातें, लब्ध्वा आत्मलाभातेंपाऊन, ततः त्यापेक्षां, अधिकं अधिकऐसा, अपरंलाभं लाभांतरातें, नमन्यते नाहींचिंतीत, यस्मिन्स्थितः ज्यास्वरूपींराहिलाऐसाहोत्साता, गुरुणा थोरऐसें, दुःखेनापि शस्त्रनिष्पातादिदुःखेंकरूनही, नविचाल्यते नाहींचळणपावत, ॥ २२ ॥

तंविद्याद्दुःखसंयोगवियोगंयोगसंज्ञितं ॥
सनिश्चयेनयोक्तव्योयोगोनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

तं तो, दुःखसंयोगवियोगं दुःखाचासंयोगवियोगनाहीं ज्याचाठायीं-ऐसा, योगसंज्ञितं योगऐशीआहेसंज्ञाज्यासऐशातें, विद्यात् जाणावें, अनिर्विण्णचेतसा आलस्यरहितांतःकरणवंतजोतेणें, सःयोगः तोयोगजोतो, निश्चयेन गुरुशास्त्रदृढाभ्यासेंकरून, योक्तव्यः अभ्यासावा, ॥ २३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वासर्वानशेषतः ॥
मनसैवेंद्रियग्रामंविनियम्यसमंततः ॥ २४ ॥

किंच आणिक, संकल्पप्रभवान् संकल्पापासूनजन्मआहेज्यांसऐसे, सर्वान् सर्वही, कामान् इच्छाविशेषजेत्यांतें, अशेषतः निःशेष, त्य-

क्का टाकून, मनसैव मनेंकरूनच, समंततः चहूंकडून, इंद्रियग्रामं इंद्रियसमुदायजोत्यातें, विनियम्य बरानिग्रहकरून, ॥ २४ ॥ ॥

शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्याधृतिगृहीतया ॥
आत्मसंस्थंमनःकृत्वानकिंचिदपिचिंतयेत् ॥ २५ ॥

धृतिगृहीतया धैर्ययुक्तऐशी, बुद्ध्या बुद्धिजेतीणें, शनैःशनैः हळुहळु, उपरमेत् मनातेंनिरोधावें, मनः मनातें, आत्मसंस्थं स्वरूपींस्थिरऐशातें, कृत्वा करून, किंचिदपि काहींही, नचिंतयेत् नचिंतावें, ॥ २५ ॥

यतोयतोनिश्चरतिमनश्चंचलमस्थिरं ॥
ततस्ततोनियम्यैतदात्मन्येववशंनयेत् ॥ २६ ॥

यतोयतः ज्याशब्दादिविषयास्तव, अस्थिरं स्थिरनव्हेऐसें, चंचलं विक्षेपाभिमुखऐसें, मनः मनजेतें, निश्चलति विषयाभिमुखहोतें, ततस्ततः त्यात्याविषयांपासून, एतत् यामनातें, नियम्य विषयांपासूनफिरवून, आत्मन्येव स्वप्रकाशआत्म्याचेठायीं, वशंनयेत् निरोधकरो, ॥ २६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

प्रशांतमनसंह्येनंयोगिनंसुखमुत्तमं ॥
उपैतिशांतरजसंब्रह्मभूतमकल्मषं ॥ २७ ॥

प्रशांतमनसं बरवेंशांतआहेमनज्याचेंऐसा, शांतरजसं क्षीणझालेमोहादिकज्याचेतोऐसा, ब्रह्मभूतं जीवन्मुक्तऐसा, अकल्मषं पापपुण्यरहितऐसा, एनंयोगिनं हायोगीजोयातें, सुखमुत्तमं उत्तमसुखजेतें, उपैति पावतें, हि प्रसिद्धचकीं, ॥ २७ ॥ ॥ ॥ ॥

युंजन्नेवंसदात्मानंयोगीविगतकल्मषः ॥
सुखेनब्रह्मसंस्पर्शमत्यंतंसुखमश्नुते ॥ २८ ॥

विगतकल्मषः दोषरहितऐसा, योगी योगीजोतो, सदा सर्वकाळीं,

आत्मानं अंतःकरणजेंत्यातें, एवं यथोक्तकर्मेंकरून, युंजन् वशकरितहोत्साता, सुखेन अनायासेंकरून, ब्रह्मसंस्पर्शं आत्मसाक्षात्काररूपऐसें, अत्यंतं उत्कृष्टऐसें, सुखं सुखजेंत्यातें, अश्नुते अनुभवितो, ॥ २८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

सर्वभूतस्थमात्मानंसर्वभूतानिचात्मनि ॥
ईक्षतेयोगयुक्तात्मासर्वत्रसमदर्शनः ॥ २९ ॥

योगयुक्तात्मा योगाभ्यासेंकरूनएकाग्रआहेचित्तज्याचेंऐसा, सर्वत्र स्थावरजंगमभूतांचाठायीं, समदर्शनः निर्विशेषब्रह्मजेंत्यातेंचपाहणारऐसातो, सर्वभूतस्थं सर्वभूतांचाठायींराहणारऐसा, आत्मानं कूटस्थआत्माआपणजोत्यातें, च तैसा, सर्वभूतानि सर्वभूतेंजींत्यातें, आत्मनि आपुल्याठायीं, ईक्षते पाहतो, ॥ २९ ॥ ॥ ॥ ॥

योमांपश्यतिसर्वत्रसर्वंचमयिपश्यति ॥
तस्याहंनप्रणश्यामिसचमेनप्रणश्यति ॥ ३० ॥

यः जो, मां मातें, सर्वत्र सर्वभूतांचाठायीं, पश्यति पाहतो, सर्वंच ब्रह्मादिकसर्वभूतेंजींत्यांतें, मयि माझाठायीं, पश्यति पाहतो, तस्य आत्मनिष्ठजोत्यास, अहं मीईश्वरजोतो, नप्रणश्यामि परोक्षनाहींहोत, सच तोही, मे मज, नप्रणश्यति परोक्षनाहींहोत, ॥ ३० ॥

सर्वभूतस्थितंयोमांभजत्येकत्वमास्थितः ॥
सर्वथावर्तमानोऽपिसयोगीमयिवर्तते ॥ ३१ ॥

एकत्वं एकात्मत्वजेंत्यातें, आस्थितः आश्रयीऐसा, यः जो, सर्वभूतस्थितं सर्वप्राणिस्थऐसा, मां मातें, भजति भजतो, सर्वथा आपुल्याभक्तनानुरूप, वर्तमानोपि वर्ततहोत्साताही, सयोगी तोयोगीजोतो, मयि मीजोनित्यमुक्तत्यामाझाठायीं, वर्तते राहतो, ॥ ३१ ॥ ॥

आत्मौपम्येनसर्वत्रसमंपश्यतियोऽर्जुन ॥
सुखंवायदिवादुःखंसयोगीपरमोमतः ॥ ३२ ॥

हेअर्जुन अगाअर्जुना, आत्मौपम्येन आपल्यादृष्टांतेंकरून, सर्वत्र सर्वभूतांचाठायीं, सुखंवा आपुल्यासुखाचेपरीसुखातें, यदिवादुःखं आपुल्यादुःखाचेपरीदुःखजेंत्यातें, यः जो, समं समान, पश्यति पाहतो, सः तो, योगी योगीजोतो, परमः उत्कृष्टऐसा, मतः संमत-ऐसा, ॥ ३२ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

अर्जुनउवाच योऽयंयोगस्त्वयाप्रोक्तःसाम्येन मधुसूदन ॥ एतस्याहंनपश्यामिचंचलत्वात्स्थितिंस्थिरां ॥ ३३ ॥

हेमधुसूदन अगामधुसूदना, योयं जोहासर्वत्रसमदृष्टिलक्षणऐसा, योगः योगजोतो, साम्येन समत्वेंकरून, त्वया तुवां, प्रोक्तः सांगीतला, एतस्य यायोगास, मनसः मनाच्या, चंचलत्वात् चंचलत्वास्तव, अहं मीजोतो, स्थिरां चिरकालानुवर्तीऐशी, स्थितिं विद्यमानताजेतीतें, नपश्यामि नाहीं पाहात, ॥ ३३ ॥ ॥ ॥ ॥

चंचलंहिमनःकृष्णप्रमाथिबलवद्दृढं ॥
तस्याहंनिग्रहंमन्येवायोरिवसुदुष्करं ॥ ३४ ॥

हेकृष्ण अगाभक्तपापनिवारका, मनः मनजेतें, चंचलं चंचल, हि प्रसिद्धचकीं, आणिकही, प्रमाथि शरीरइंद्रियांतेंविक्षेपूनपरवशकरणारऐसें, बलवत् कोणाच्यानेंहीनिग्रहकरावयाअशक्यऐसें, दृढं नामपाशासारिखेंअच्छेद्य, तस्य त्यामनाचा, अहं मीजोतो, निग्रहं निरोधजोत्यातें, वायोरिववायूचेपरी, सुदुष्करं करावयाअशक्यऐसें, मन्ये मानितों, ॥ ३४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**श्रीभगवानुवाच असंशयंमहाबाहोमनोदुर्नि ग्रहंचलं॥ अभ्यासेनतुकौंतेयवैराग्येणचगृह्य ते॥ ३५॥**

हेमहाबाहो अगाअर्जुना, मनः मनजेतें, दुर्निग्रहं दुःखेंकरूननिग्रहासयोग्य, चलं चपल, इति ऐसेंबोलणेंजेतें, असंशयं खरेंच, कौंतेय अर्जुना, किंतु कायतर, अभ्यासेनतु स्वस्वरूपींचित्तवृत्तिठेवणेंतेणेंकरून, वैराग्येणच विषयांचाठायींअतृष्णेकरूनही, गृह्यते घेइजेत, ॥ ३५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

**असंयताऽऽत्मनायोगोदुष्प्रापइतिमेमतिः॥ वश्यात्मनातुयततााशक्योवाप्तुमुपायतः॥ ३६॥**

असंयतात्मना वैराग्याभ्यासेंकरूननेमिलेंनाहींचित्तजेणेंऐसाजोतेणें, योगः योगजोतो, दुष्प्रापः दुःखेंकरूनपाविजेतो, इति ऐशी, मेमतिः माझीबुद्धि, यतता आणिकप्रयत्नकरणारऐसा, वश्यात्मनातु वश्यझालेंआहेमनज्याचेंतेणें, उपायतः बोलिल्याउपायास्तव, आप्तुं पावावयाकारणें, शक्यः समर्थहोय, ॥ ३६ ॥

**अर्जुनउवाच अयतिःश्रद्धयोपेतोयोगाच्चलितमानसः॥ अप्राप्ययोगसंसिद्धिंकांगतिंकृष्ण गच्छति॥ ३७॥**

हेकृष्ण अगाकृष्णा, अयतिः अल्पप्रयत्नीऐसा, श्रद्धयोपेतः गुरुवेदांतवाक्यविश्वाससहितऐसा, योगाच्चलितमानसः तत्त्वसाक्षात्कारींनपावेमनज्याचेंतोऐसा, योगसंसिद्धिं अज्ञाननिवृत्तिजेतीतें, अप्राप्य नपावून, कांगतिं कोणगतीतें गच्छति जातो, ॥ ३७ ॥

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिवनश्यति॥**

अप्रतिष्ठोमहाबाहोविमूढोब्रह्मणःपथि ॥ ३८ ॥

हेमहाबाहो अगाकृष्णा, उभयविभ्रष्टः ज्ञानकर्ममार्गापासूनचवला- ऐसा, अप्रतिष्ठः आश्रयरहितऐसा, ब्रह्मणः ब्रह्मजेंत्याच्या, पथि उपा- यमार्गी, विमूढः मूढहोत्साता, छिन्नाभ्रमिव फुटल्यामेघाचेपरी, नो- नश्यतिकच्चित् नाहींनाशातेंपावतकाय, किंतु तरकाय, नश्यत्येव ना- शातेंपावतोच, ॥ ३८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

एतन्मेसंशयंकृष्णच्छेत्तुमर्हस्यशेषतः ॥
त्वदन्यःसंशयस्यास्यच्छेत्तानह्युपपद्यते ॥ ३९ ॥

हेकृष्ण अगाकृष्णा, त्वं तूंजोतो, एतत् हा, मे माझा, संशयं संशय- जोत्यातें, अशेषतः समूळ, छेत्तुं परिहारकरावयाकारणें, अर्हसि योग्यआहेस, त्वदन्यः तुजहूनिदुसरादेवांकिवाऋषीजोतो, अस्य या- संशयाचा, छेत्ता उपशमकरणारऐसा, हि निश्चयेंकरून, नउपपद्यते नाहींसंभवत, ॥ ३९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीभगवानुवाच पार्थनैवेहनामुत्रविनाशस्त
स्यविद्यते ॥ नहिकल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिंतातग
च्छति ॥ ४० ॥

हेपार्थ अगाअर्जुना, तस्य तोउभयभ्रष्टजोत्यास, इह यालोकाचा- ठायीं, विनाशः पातित्यजेतें, अमुत्र परलोकीं, विनाशः नरकप्राप्ति- जेते नैवविद्यते नाहींच, हेतात अगाबापाशिष्या, हि ज्याकार- णास्तव, कल्याणकृत्शुभकर्ता, कश्चित् कोणीही, दुर्गतिं कुत्सितग- तीतें, नगच्छति नाहींपावत, ॥ ४० ॥ ॥ ॥ ॥

प्राप्यपुण्यकृतांल्लोकानुषित्वाशाश्वतीःसमाः ॥
शुचीनांश्रीमतांगेहेयोगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

योगभ्रष्टः योगापासूनचवलाऐसा, पुण्यकृतां अश्वमेधादिकयज्ञ करणाऱ्यांसप्राप्यऐसे, लोकान् लोकजेत्यांतें, प्राप्य पावून, शाश्वतीः नित्यऐशा, समाः बहुतसंवत्सरजेत्यांतें, उषित्वा वासअनुभवून, शुचीनां यथोक्ताचारऐसे, श्रीमतां संपत्तिवंतांच्या, गेहे घराचाठायीं, अभिजायते उत्पन्नहोतो, ॥ ४१ ॥ ॥ ॥ ॥

अथवायोगिनामेवकुलेभवतिधीमतां ॥
एतद्धिदुर्लभतरंलोकेजन्मयदीदृशम् ॥ ४२ ॥

अथवा नाहींतरि, धीमतां बुद्धिमंतऐसे, योगिनामेव योगीजेत्यांच्याच, कुले कुळीं, भवति जन्मतो, ईदृशं याप्रकारचें, यत् जें, जन्म जन्मजेतें, एतद्धि योगिकुळींजन्महेंतरी, लोके लोकाचाठायीं, दुर्लभतरं अत्यंतदुर्लभ, ॥ ४२ ॥ ॥ ॥ ॥ ॥

तत्रतंबुद्धिसंयोगंलभतेपौर्वदेहिकं ॥
यततेचततोभूयःसंसिद्धौकुरुनंदन ॥ ४३ ॥

हेकुरुनंदन अगाकुरुकुळानंदकरा, तत्र त्यायोगियाचेकुळीं, पौर्वदेहिकं पूर्वदेहींसंपादिलाऐसा, तंबुद्धिसंयोगं तोबुद्धियोगजोत्यातें, लभते पावतो, ततः त्यानंतर, भूयः मागुतींअत्यंत, संसिद्धौ मोक्षाचाठायीं, यतते प्रयत्नकरितो, ॥ ४३ ॥ ॥ ॥ ॥

पूर्वाभ्यासेनतेनैवह्रियतेह्यवशोऽपिसः ॥
जिज्ञासुरपियोगस्यशब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

तेनपूर्वाभ्यासेनैव, तोजोपूर्वाभ्यासतेणेंकरून, अवशोपि अवशहोत्साताही, सः तोयोगीजोतो, ह्रियते अभ्यासींवर्ततो, हि निश्चयेंसी, योगस्य योगजोत्याचा, जिज्ञासुरपि स्वरूपजाणावयाइच्छितहोत्साताही, शब्दब्रह्म वेदांतोक्तकर्मानुष्ठानजेंत्यातें, अतिवर्तते उल्लंघूनपुढेंजातो, ॥ ४४ ॥

प्रयत्नाद्यतमानस्तुयोगीसंशुद्धकिल्बिषः॥
अनेकजन्मसंसिद्धस्ततोयातिपरांगतिं॥ ४५॥

संशुद्धकिल्बिषः निर्धूतपापऐसा, प्रयत्नात् पुरुषप्रयत्नेंकरून, यतमानः प्रयत्नकरणारऐसा, अनेकजन्मसंसिद्धः बहुतजन्मांचाठायींसंपादिलाजोयोगतेणेंकरूनबरवाज्ञानीहोत्साता, योगीतु योगीतोतर, ततः त्याहून, परांगतिं उत्कृष्टगतीतें, याति पावतो, ॥ ४५ ॥

तपस्विभ्योऽधिकोयोगीज्ञानिभ्योऽपिमतोधिकः॥
कर्मिभ्यश्चाधिकोयोगीतस्माद्योगीभवार्जुन॥४६

तपस्विभ्यः व्रतउपवासादिकरूनशरीरशोषकजेत्यांहून, योगी योगीजोतो, अधिकः अधिकहोय, ज्ञानिभ्योपि शास्त्रपांडित्यकर्तेजेत्यांपेक्षांही, अधिकः थोरऐसा, मतः मान्यहोय, कर्मिभ्यश्च अग्निहोत्रादिकर्मनिष्ठजेत्यांपेक्षांही, अधिकः श्रेष्ठहोय, तस्मात् त्याकारणास्तव, हेअर्जुन अगाअर्जुना, त्वं तूं, योगी ज्ञाननिष्ठऐसा, भव हो, ॥४६॥

योगिनामपिसर्वेषांमद्गतेनांतरात्मना॥
श्रद्धावान्भजतेयोमांसमेयुक्ततमोमतः॥४७॥

सर्वेषां इतरदेवताभक्तसर्वऐसे, योगिनामपि योगीजेत्यांमध्येंही, मद्गतेन माझेठायींविद्यमानऐसा, अंतरात्मना अंतःकरणेंकरून, श्रद्धावान् आस्तिक्यबुद्धिहोत्साता, यः जो, मां मातें, भजते सेवितो, सः तो, मे मज, युक्ततमः अतिशयेंकरूनयुक्तऐसा, मतः निश्चयेंहोय, ॥ ४७ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

ओंतत्सदितिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सुब्रह्मविद्यायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादेअभ्यासयोगोनामषष्ठोऽध्यायः॥६॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

# सप्तमाध्यायप्रारंभः



श्रीगणेशायनमः ॥ प्रथमषट्कैंकरून पदलक्षणबोलिला आतांध्येय प्रतिपादनमध्यषट्कैंकरून बोलतो, ॥

**श्रीभगवानुवाच मय्यासक्तमनाःपार्थयोगंयुंजन्मदाश्रयः॥ असंशयंसमग्रंमांयथाज्ञास्यसि तच्छृणु॥ १ ॥**

हेपार्थ अगाअर्जुना, मयि माझाठायीं, आसक्तमनाः आसक्तमनज्याचेंतोऐसा, मदाश्रयः माझाआहेआश्रयज्यासऐसा, योगं योगजोत्यातें, युंजन् करितहोत्साता, असंशयं निःसंशय, समग्रं सर्वविभूतिसहितऐसा, मां मातें, यथा ज्याप्रकारेंकरून, ज्ञास्यसि जाणावयायोग्यहोशील, तत् त्यातें, श्रृणु वक्ष्यमाणवाक्यातेंऐक, ॥ १ ॥

**ज्ञानंतेऽहंसविज्ञानमिदंवक्ष्याम्यशेषतः॥ यज्ज्ञात्वानेहभूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते॥ २ ॥**

अहं मीजो, ते तुजकारणें, सविज्ञानं अपरोक्षसहित, इदंज्ञानं हेंज्ञानजेंत्यातें, अशेषतः संपूर्णऐशातें, वक्ष्यामि सांगतों, यज्ज्ञात्वा जेंजाणिल्यावर, इह येथें, भूयः मागुतीं, अन्यत् दुसरें, ज्ञातव्यं जाणावयायोग्यऐसें, नअवशिष्यते नाहींउरत, ॥ २ ॥

**मनुष्याणांसहस्रेषुकश्चिद्यततिसिद्धये॥ यततामपिसिद्धानांकश्चिन्मांवेत्तितत्त्वतः॥ ३ ॥**

मनुष्याणां मनुष्यजेत्यांच्या, सहस्रेषु सहस्रांमध्यें, कश्चित् एखादा, सिद्धये सिद्धीकारणें, यतति यत्नकरितो, यततामपि यत्नकरणारांमध्यें, सिद्धानां सिद्धजेत्यामध्येंही, कश्चित् कोणीएक, तत्त्वतः जसा-

